**सामाजिक न्याय व आदिवासी विकास विभागामार्फत देण्यात येणाऱ्या शिष्यवृत्ती प्रकरणांमध्ये झालेल्या गैरव्यवहाराची चौकशी करण्याकरिता विशेष चौकशी पथकास (टास्क फोर्स) मुदतवाढ देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण :- ०८१५/प्र.क्र.५२८ (भाग-५)/पोल १३

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३ जून, २०१७

**वाचा :-**

१) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक :- संकीर्ण ०८१५/प्र.क्र.५२८/पोल १३, दि.१५.०१.२०१६
२) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक :- संकीर्ण ०८१५/प्र.क्र.५२८/पोल १३, दि.१९.०३.२०१६
३) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक :- संकीर्ण ०८१५/प्र.क्र.५२८/पोल १३, दि.१६.०४.२०१६
४) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक :- संकीर्ण ०८१५/प्र.क्र.५२८/पोल १३, दि.१२.०७.२०१६
५) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक :- संकीर्ण ०८१५/प्र.क्र.५२८/पोल १३, दि.१४.१२.२०१६
६) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक :- संकीर्ण ०८१५/प्र.क्र.५२८/पोल १३, दि.०४.०३.२०१७

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाची मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती वाटपात राज्यामध्ये गैरव्यवहार झाले किंवा कसे याबाबत चौकशी करण्याकरिता शासन निर्णय गृह विभाग क्रमांक :- संकीर्ण ०८१५/प्र.क्र.५२८/पोल १३, दि.१५ जानेवारी, २०१६ अन्वये श्री.के. व्यंकटेशम, अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण), मुंबई (सध्या पोलीस आयुक्त, नागपूर) यांच्या अध्यक्षतेखाली विशेष चौकशी पथक (टास्कफोर्स) ची स्थापना करण्यात आली आहे.

२. सदर चौकशी पथकास आपला अहवाल सादर करण्यासाठी ६० दिवसांचा कालावधी देण्यात आला होता. तथापि, सदर मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती व शिक्षण शुल्क वाटपातील अनियमितता

व गैरव्यवहार यांची चौकशी करण्याची व्याप्ती मोठी असल्याने सदर विशेष चौकशी पथकास आणखी १ महिन्याची म्हणजेच दिनांक १५ मार्च, २०१६ पासून ते १४ एप्रिल, २०१६ पर्यंत इतक्या कालावधीकरिता दिनांक १९ मार्च, २०१६ च्या शासन निर्णयान्वये मुदत वाढ देण्यात आलेली होती. तद्नंतर दिनांक १६ एप्रिल, २०१६ च्या शासन निर्णयान्वये २ महिन्यांची मुदतवाढ देण्यात आली होती. तद्नंतर, दिनांक १२ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयान्वये ६ महिन्यांची मुदतवाढ देण्यात आली होती, व दिनांक १४ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये २ महिन्यांची मुदतवाढ देण्यात आली होती. त्यानंतर दिनांक ०४ मार्च, २०१७ च्या शासननिर्णयान्वये दोन महिन्याची मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदत दिनांक १४ एप्रिल, २०१७ रोजी संपुष्टात आली आहे. त्यामुळे, आता, या शासन निर्णयान्वये सदरच्या विशेष चौकशी पथकास २ महिन्यांकरिता, म्हणजेच, दिनांक १४ जून, २०१७ अखेरपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६०३१३२१००८६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**,**

Yuvraj B Ajetrao

Digitally signed by Yuvraj B Ajetrao
DN: CN = Yuvraj B Ajetrao, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2017.06.03 15:57:40 +05'30'

**( युवराज अजेटराव )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव.
५. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव, (सामाजिक न्याय, आदिवासी विकास, उच्च व तंत्र शिक्षण, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये, शालेय शिक्षण व क्रीडा, कृषी व पदुम, महसूल व वन, वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई.

६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

७. श्री.के. व्यंकटेशम, पोलीस आयुक्त, नागपूर.

८. श्री.पियुष सिंग, आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

९. श्री.रणजीतसिंह देओल, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.

१०. सर्व पोलीस महानिरीक्षक.

११. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

१२. संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१४. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

१६. सर्व जिल्हाधिकारी.

१७. सर्व पोलीस अधिक्षक / पोलीस आयुक्त.

१८. निवडनस्ती (पोल-१३)